जनहित याचिका क्र. ६८/२०१४ मा. उच्च न्यायालय विरुद्ध भारतीय विमानपत्तन प्राधिकरण व इतर.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जहिया ३७१५/प्र.क्र.९७/२८-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १२ मे, २०१५.

**प्रस्तावना -**

नागपूर आंतरराष्ट्रीय विमानतळावरुन हज यात्रेकरुना हज यात्रेसाठी घेऊन जाणाऱ्या विमानाच्या तांत्रिक बिघाडामुळे झालेला विलंब व यात्रेकरुंना सहन कराव्या लागणाऱ्या त्रासांबाबत मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठाने स्यू मोटो जनहित याचिका क्र.६८/२०१४ दाखल केली आहे. या याचिकेत राज्य शासन (नागरी विमानचालन) विभागास प्रतिवादी क्र.७ करण्यात आले आहे.

**शासन निर्णय -**

प्रस्तुत जनहित याचिका क्र. ६८/२०१४ मध्ये उपस्थित करण्यात आलेले मुद्दे विचारात घेवून राज्य शासनाच्या वतीने (प्रतिवादी क्र.७) मा.उच्च न्यायालयात प्रतिज्ञापत्र करणे व इतर अनुषंगिक कामांकरिता अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, मिहान इंडिया लि. यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, मिहान इंडिया लि यांनी वेळोवेळी राज्य शासनाची बाजू मा. उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आणावी व जनहित याचिकेबाबत शासनास वेळोवेळी अहवाल सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२११५२३०६९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: CN = SAMEER ANANT SAWANT, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = General Administration Dept
Date: 2015.05.12 14:41:53 +05'30'

**(समीर सावंत)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, मिहान इंडिया लि., नागपूर.
२. ॲड. भारती डांगरे, शासकीय अभियोक्ता, मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर
३. कक्ष अधिकारी, विधी व न्याय विभाग, मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर.

**प्रत,**

१.अ.मु.स.(विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक.
२. निवडनस्ती, कार्यासन २८-अ, साप्रवि, मंत्रालय, मुंबई.